# जेन गुडआलची (वि)चित्रकथा

जेन गुडआल (ज. १९३४) या सुप्रसिद्ध स्त्रीवैज्ञानिकाच्या बालपणाविषयी, बालपणातील तिच्या स्वप्नाविषयी व ते स्वप्न खरे करण्यासाठी तिने घेतलेले कष्ट याबद्दलची ही एक चित्रकथा आहे. Me…Jane या पुस्तकातील ही रेखाचित्रे पॅट्रिक् मॅकडोनेल यांनी काढलेले आहेत.



जेनचे बालपण लंडन येथे गेले. तिच्या वडिलांनी तिला भुश्यानी भरलेल्या चिंपांझी या प्राण्याची एक बाहुली भेट म्हणून दिली. तिला ते अत्यंत आवडत होते. जवळच्या रानातील पक्ष्यांच्या बरोबर ती बडबड करत असे. वयाच्या १० व्या वर्षीच तिला आफ्रिकेतील जंगलाचे वेड लागले होते.   तिने त्याचे ज्युबिली म्हणून नाव ठेवले.



जिथे जिथे ती जात होती तिथे तिथे ही ज्युबिली बाहुली तिच्या बरोबर असे.



जेन व ज्युबिलीची जोडी गावाबाहेर भटकत होती. पक्षी, खारूताई, कोळी-कीटक, मुंग्या, फुलपाखरं  व इतर छोट्या प्राणांच्या सांनिध्यात तिचा (व ज्युबिलीचा) चांगल्या प्रकारे वेळ जात होता.



रात्री घरी परतल्यावर जेन व ज्युबिली पुस्तक वाचून दिवसभरात घडलेल्या गोष्टी समजून घेत होते.



एके दिवशी तिला अंडी कुठून व कसे येतात याचे कुतूहल वाटले. ती हळूच आजीच्या घराच्या जवळ असलेल्या कोंबड्यांच्या खुराड्यात  जाऊन लपून बसली.



आणि या चमत्काराची प्रतीक्षा करू लागली.



तिला आपण एका वेगळ्या जगात आहोत की काय असे वाटू लागले.



तिच्या दृष्टीने ती एका जादूई नगरीत होती व त्या घटनेची साक्षीदार होती.



ज्युबिलीला पाठीवर बसवून झाडावर चढून बसण्यात तिला मजा वाटत होती. टार्झनची पुस्तकं वाचल्याचा हा परिणाम होता.



एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर लटकत जावे अशी तिची तीव्र इच्छा होती.



आपण जणू काही आफ्रिकेतील घनदाट जंगलात आहोत असेच तिला वाटत होते.



आपण आफ्रिकेच्या जंगलात आहोत, सर्व प्राणी आपल्याला भेटत आहेत, व मी त्यांना मदत करत आहे असे तिला स्वप्न पडत होते.



रोज रात्री जेन ज्युबिलीच्या बरोबर  बिछान्यात झोपल्यानंतर हे स्वप्न पडण्याची वाट बघत असे.



एखाद्या रात्री ते स्वप्न न पडल्यास तिला फार वाईट वाटत होते.



याच स्वप्नांच्यामुळे तिने  आपल्या आयुष्याला वेगळे वळण लावले.



या प्राणीविषयक वेडापायी जेन १९५७ मध्ये आफ्रिकेतील केनियाला गेली. लुई लीकी या मानववंशशास्त्रज्ञाच्या मदतीमुळे तिला वानर वंशातील प्राण्यांचा अभ्यास करण्याची संधी मिळाली. त्या संधीचे तिने सोने केले. कुठलिही बीए बीएससी सारखी पदवी नसतानासुद्धा तिला केंब्रिज युनिव्हर्सिटीने डॉक्टरेट पदवी देऊन तिच्या अभ्यासाला मान्यता दिली. टांझानियामध्ये जंगलात राहून तिने चिंपांझी या प्राणी परिवाराच्या वर्तणुकीचा अभ्यास केला. या प्राण्याच्या रक्षणासाठी तिने देणगी गोळा केली व त्यातून Gombe Stream National Park उभे केले. तिला प्राणीमित्र म्हणून जग ओळखते.

